परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान व रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ति उपदान तसेच सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ति उपदान मंजूर करण्याबाबत. (अकृषि विद्यापीठे, संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालये इ.)

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२३०४/प्र.क्र.८७/विशि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:-२५ मे, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दि.२५.०३.२०११
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.धोरण-३०११/(१६५/११)/तांशि-२, दि.१७.०६.२०१५.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.एनपीएस-२०१९/प्र.क्र.३६६/१९/विशि-१, दि.१७.०३.२०२१
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१९७/१९/विशि-१, दि.१८.०८.२०२१
५) शासन पूरकपत्र, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१९७/१९/विशि-१, दि.१०.०६.२०२२.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.रानियो-२०२२/प्र.क्र.३४/सेवा-४, दि.३१.०३.२०२३.
७) शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग क्र.रानियो-२०२२/प्र.क्र.३४/सेवा-४, दि.२०.०४.२०२३

प्रस्तावना :-

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.२५.०३.२०११, दि.१७.०६.२०१५ व दि.१७.०३.२०२१ च्या शासन निर्णयांन्वये अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालये/तंत्रशास्त्र, अभियांत्रिकी, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/तंत्रनिकेतने, तंत्र शिक्षण संचालनालय/कला संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या अशासकीय अनुदानित संस्था, शासन अनुदानित अभिमत विद्यापीठे यामध्ये दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू करण्यात आली आहे. परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीचे लाभ अनुज्ञेय ठरत नाहीत.

२. वित्त विभागाने दि.३१.०३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये व दि.२०.०४.२०२३ च्या शुध्दीपत्रकान्वये राज्य शासनाच्या सेवेतील परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा सेवाकालावधीत मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला, कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान व रुग्णता सेवानिवृत्त कर्मचाऱ्यास रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान तसेच सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ति उपदान अनुज्ञेय केले आहे. "उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदी जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये तसेच कृषी विद्यापीठे व तत्सम अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफारांसह लागू राहतील. मात्र याबाबत स्वतंत्र आदेश संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावर निर्गमित करावेत," असे सदर शासन निर्णयात नमूद केले आहे.

३. वित्त विभागाने वरीलप्रमाणे दिलेले निर्देश विचारात घेऊन उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिनस्त असलेली अकृषि विद्यापीठे व संलग्नित मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/तंत्रशास्त्र, अभियांत्रिकी, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/तंत्रनिकेतने, तंत्र शिक्षण संचालनालय/कला संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या अशासकीय अनुदानित संस्था तसेच, शासन अनुदानित अभिमत विद्यापीठे यामधील अनुदानित पदावर नियुक्त, परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला, कुटुंबनिवृत्तिवेतन आणि मृत्यू उपदान व रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ति उपदान तसेच, सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ति उपदान लागू करण्यासंदर्भातील आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

दि.१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर अकृषि विद्यापीठे व संलग्नित मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/ तंत्रशास्त्र, अभियांत्रिकी, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/ तंत्रनिकेतने, तंत्र शिक्षण संचालनालय/ कला संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या अशासकीय अनुदानित संस्था, शासन अनुदानित अभिमत विद्यापीठे यामधील शासन अनुदानित पदावर नियुक्त झालेल्या व परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्ति वेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा,

(अ) सेवेत असतांना मृत्यू झाल्यास त्याच्या कुटुंबाला कुटुंबनिवृत्ति वेतन आणि मृत्यू उपदान,

(ब) रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रुग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ति उपदान लागू करण्यात येत आहे. त्यानुसार सदर कुटुंब निवृत्तिवेतन धारकास व रुग्णता निवृत्तिवेतन धारकास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम,१९८२ मधील तरतुदीप्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन / रुग्णता निवृत्ति वेतनलागू होईल.

(क) तसेच सेवेतून निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ति उपदान लागू करण्यात येत आहे.

वरील निर्णयानुसार प्रदान करण्यात येणाऱ्या सेवानिवृत्ति उपदान व मृत्यू उपदानाच्या प्रयोजनार्थ सद्य:स्थितीत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील तरतूदी लागू राहतील.

२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१९७/१९/विशि-१, दि.१८.०८.२०२१ व शासन पूरकपत्र दि.१०.०६.२०२२ अन्वये लागू करण्यात आलेली सानुग्रह अनुदान योजना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून बंद करण्यात येत आहे. सानुग्रह अनुदानासाठी प्राप्त झालेले अर्ज विचारात घेण्यात येऊ नयेत, तसेच प्रलंबित प्रकरणे बंद करण्यात यावीत.

३. दि.०१.११.२००५ ते या निर्णयाच्या दिनांकापर्यंत मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबास मृत्यू उपदान, कुटुंब निवृत्तिवेतनाची थकबाकी तसेच नियमित कुटुंब निवृत्तिवेतन मिळण्यासाठी सदर शासन निर्णयासोबतचा नमुना-३ मधील विकल्प कार्यालय प्रमुखाकडे सादर करावा लागेल. त्यानुसार कुटुंब निवृत्तिवेतनधारकास त्याला मिळालेल्या सानुग्रह अनुदानाची रक्कम व परिभाषित निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची व्याज / लाभांशासह रक्कम समायोजित करण्याच्या अटीवर कुटुंब निवृत्तिवेतनाचा लाभ अनुज्ञेय होईल. सदर रक्कम समायोजित झाल्यानंतर कुटुंब निवृत्तिवेतनधारकास नियमितपणे कुटुंब निवृत्तिवेतन अनुज्ञेय राहील.

४. राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत सध्या कार्यरत असलेल्या व यापुढे सेवेत नियुक्त होणारा कर्मचारी यांनी त्यांचा सेवेत असताना मृत्यू झाल्यास किंवा रुग्णता सेवानिवृत्त झाल्यास, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा रुग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय करण्याबाबत अथवा राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत त्याची कायम निवृत्तिवेतन लेखा क्रमांक (PRAN) मध्ये जमा असलेली संचित रक्कम निवृत्तिवेतन निधी विनियमक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार अनुक्रमे कुटुंबास किंवा त्याला मिळण्याबाबतचा सोबतचा नमुना-२ मध्ये विकल्प कार्यालय प्रमुखाकडे सादर करावा.

५. जे कर्मचारी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा रुग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय करण्याबाबतचा विकल्प सादर करतील, त्यांनी नमुना-१ प्रमाणे कुटुंबाचा तपशील सादर करणे अनिवार्य आहे.

६. राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या सर्व कर्मचाऱ्यांनी शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वरील परिच्छेद क्र.४ प्रमाणे विकल्प देणे बंधनकारक राहील. तसेच यापुढे सेवेत नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांनी उपरोक्तप्रमाणे विकल्प सेवेत नियुक्त झाल्यावर ८ दिवसाच्या आत सादर करणे आवश्यक राहील.

७. या अनुषंगाने कार्यपध्दतीबाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२६१२१९५३५२०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.05.26 12:22:03 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई,

२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व माननीय मंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
९) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) महालेखापाल १-(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
११) महालेखापाल १-(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१२) महालेखापाल २-(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
१३) महालेखापाल २-(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१४) कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे,
१५) कुलगुरू, सर्व अभिमत विद्यापीठे,
१६) उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१७) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८) कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
२०) सर्व विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण,
२१) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
२२) कुलसचिव, सर्व अभिमत विद्यापीठे,
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने
२५) निवड नस्ती (विशि-१).

**नमुना १**

**कुटुंबाचा तपशील**

कर्मचाऱ्याचे नाव ..
पदनाम ..
जन्म तारीख ..
नियुक्तीचा दिनांक ..

..............................रोजी माझ्या कुटुंबात असलेल्या सदस्यांचा तपशील

| अ.क्र. | कुटुंबातील सदस्याचे नाव* | जन्मतारीख | कर्मचाऱ्याशी असलेले नाते | कार्यालय प्रमुखाची सही | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | |
| २ | | | | | |
| ३ | | | | | |
| ४ | | | | | |
| ५ | | | | | |
| ६ | | | | | |
| ७ | | | | | |
| ८ | | | | | |
| ९ | | | | | |

वरील तपशिलात कोणतीही भर पडल्यास किंवा फेरबदल झाल्यास त्यासंबधीची माहिती कार्यालय प्रमुखास/लेखापरीक्षा अधिकाऱ्यास कळवून हा तपशील अद्यावत ठेवण्याची मी याद्वारे हमी घेतो.

ठिकाण :
दिनांक :

कर्मचाऱ्याची सही

*या प्रयोजनासाठी “कुटुंब” याचा अर्थ महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६ (१६) (बी) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे असलेले “कुटुंब” असा होतो.

टीप.--पत्नी व पती यामध्ये अनुक्रमे न्यायिक फारकत घेतलेल्या पत्नीचा व पतीचा समावेश होतो.

## नमुना -२

सेवेत असताना कर्मचारी विकलांगतेमुळे सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यू पावल्यास त्याला अनुज्ञेय लाभ मिळण्याबाबतचा विकल्प

मी, ................................................. याद्वारे विकल्प देत आहे की, सेवेत असताना विकलांगतेमुळे सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यू पावल्यास मला / माझ्या कुटुंबास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ अनुसार लाभ देण्यात यावेत.

अथवा

मी, ................................................. याद्वारे विकल्प देत आहे की, सेवेत असताना विकलांगतेमुळे सेवेकरिता असमर्थ ठरल्यास / मृत्यू पावल्यास मला / माझ्या कुटुंबास राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अनुसार लाभ देण्यात यावेत.

कर्मचाऱ्याची स्वाक्षरी
नाव
पदनाम
कार्यालयाचे नाव व पत्ता

ठिकाण :

दिनांक :

हा विकल्प दिल्यामुळे यापूर्वी दिलेला विकल्प रद्द समजण्यात यावा.
*आवश्यक नसेल ते खोडावे.

---------------------------------------------------------------------------------

**कार्यालय प्रमुख यांनी भरावे.**

विकल्प प्राप्त झाल्याचा दिनांक .....................
याबाबतचा नोंद सेवापुस्तकामधील पृ.क्र.        /प.वि. वर घेण्यात आली आहे.

कार्यालय प्रमुखाची सही व शिक्का

विकल्प स्विकारल्याची प्रत संबंधित कर्मचाऱ्यास देण्यात यावी.

## नमुना-३

परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली लागू असलेल्या कर्मचाऱ्यांना दि.१.११.२००५ ते आजपर्यंतच्या कालावधीत रुग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांनी / मृत्यू झालेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांनी द्यावयाचा विकल्प

मी, ................................................... याद्वारे विकल्प देत आहे की, मला राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणालींतर्गत लाभ देण्यात यावे.

**अथवा**

मी, ................................................... याद्वारे विकल्प देत आहे की, मला महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ अंतर्गत लाभ देण्यात यावे. सदर लाभ अनुज्ञेय करताना परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत देण्यात आलेले लाभ समायोजित करण्यात यावे.

रुग्णता निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याची स्वाक्षरी /
कुटुंब निवृत्तिवेतन धारकाची स्वाक्षरी